**महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील गट-क व गट-ड संवर्गातील अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. २०१९/प्र.क्र.१२५/का-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २३ मार्च, २०२३

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र .बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब,दि.२१.१२.२०१९

२) आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे यांचे दि. २८.१२.२०१९ रोजीचे पत्र.

३) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे दि. २९.०१.२०२० रोजीचे पत्र.

४) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे दि. २०.२.२०२० रोजीचे पत्र.

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र .बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७-अ/१६-ब,दि.३०.६.२०२०.

६) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे दि.१३.७.२०२० रोजीचे पत्र.

७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.२०१९/प्र.क्र१२५/का-७,दि.३.८.२०२०

८) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे दि.२६.१०.२०२० रोजीचे आदेश.

९) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/आस्था/अ.ज./अधिसंख्य पद/दिधच -कलि/आदेश-रदद बाबत/२०२१-२२/१२०८/२०२२,दि.२८.२.२०२२

१०) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/आस्था/अ.ज./अधिसंख्य पद/सु.मा.लो -शिपाई/आदेश-रदद बाबत/२०२३-२४/१३४६/२०२३,दि.१३.३.२०२३

## शासन निर्णय-

वाचा क्र.१ अन्वये अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव सदर शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणा-या तसेच सदर शासन निर्णयापुर्वी सेवामुक्त करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचा-यांच्या संख्येइतकी, असे अधिकारी व कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील अथवा सेवासमाप्तीपुर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना मानवतावादी दृष्टीकोनातुन तसेच प्रशासनाची होणारी अडचण दुर करण्यासाठी सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.अंसक-१००१/ प्र.क्र.२९/ २००१/ वित्तीय सुधारणा, दि. १०-०९-२००१ अन्वये विहीत केलेल्या कार्यपदधतीनुसार अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांना तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवा निवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणूक दयावी, असे आदेश देण्यात आले होते.

२. तद्‌नंतर वाचा क्र.५ अन्वये सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २१.१२.२०१९ शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. १ (अ) ते (इ) मध्ये नमूद केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याचे तसेच अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना देण्यात आल्या होते.

३. तद्‌नुषंगाने वाचा क्र.७ येथील शासन निर्णयान्वये अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील गट-क व गट-ड संवर्गातील १५ कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आलेया आहेत. त्यामध्ये नियुक्तीनंतर जात

प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांचा देखील समावेश करण्यात आला होता. तथापि, महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय दि.३.८.२०२० च्या सोबतच्या विवरणपत्रातील अ.क्र. २,३,४,५,६,८ व ९ येथील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव प्रलंबित असल्यामुळे त्यांचे अधिसंख्य पदांवरील नाव वगळून त्यांना नियमित पदावर वर्ग करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. त्यानुषंगाने शासन निर्णय दि.३.८.२०२० च्या सोबतच्या विवरणपत्रातील अ.क्र. २,३,४,५,६,८ व ९ येथील अधिकारी/कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावरुन नियमित पदावर पुर्नस्थापित करण्यात येत आहे. तसेच सेवा व वेतन विषयक देय असलेल्या नियमित पदाच्या सर्व सवलती तसेच सेवानिवृत्तीनंतरचे सर्व लाभ लागू करण्यात येत आहेत.

५. अधिसंख्य पदावरील वर्ग करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांपैकी श्री.दिपक धनलाल चव्हाण यांचे अनुसुचित जमाती या प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र तपासणी समिती,नंदूरबार,नाशिक विभाग यांनी त्यांचे केस क्र.७/४९८०/Ser/११२०२१/२४७८१०,दि.३०.११.२०२१ च्या जात वैधता प्रमाणपत्रान्वये वैध ठरविल्याने दि.२१.१२.२०१९ मधील तरतूदीनुसार श्री.चव्हाण यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे या विभागाच्या दि.३.८.२०२० च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील अनुक्रमांक ७ वरील त्यांचे अधिसंख्य पदांवरील नाव वगळून त्यांना नियमित पदावर वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच त्यांना अधिसंख्य पदावरुन नियमित पदावर पुर्नस्थापित करण्यात येवून त्यांना सेवा व वेतन विषयक देय असलेल्या नियमित पदाच्या सर्व सवलती तसेच सेवानिवृत्तीनंतरचे सर्व लाभ लागू करण्यात येत आहेत.

६. अधिसंख्य पदावरील वर्ग करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांपैकी श्री.सुभाष माणिक लोहोकरे,शिपाई यांचे अनुसुचित जमाती या प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र तपासणी समिती,ठाणे,कोकण विभाग यांनी त्यांचे केस क्र.२/५२०/Ser/०२२०२३/२४५१६६,दि.२१.२.२०२३ च्या जात वैधता प्रमाणपत्रान्वये वैध ठरविल्याने दि.२१.१२.२०१९ मधील तरतूदीनुसार श्री.लोहोकरे यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे या विभागाच्या दि.३.८.२०२० च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील अनुक्रमांक १५ वरील त्यांचे अधिसंख्य पदांवरील नाव वगळून त्यांना नियमित पदावर वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच त्यांना अधिसंख्य पदावरुन नियमित पदावर पुर्नस्थापित करण्यात येवून त्यांना सेवा व वेतन विषयक देय असलेल्या नियमित पदाच्या सर्व सवलती तसेच सेवानिवृत्तीनंतरचे सर्व लाभ लागू करण्यात येत आहेत.

७. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब,दि.२१.१२.२०१९ व सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब,दि.१४.१०.२०२२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०३२३१७५०२८१५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d27581 48ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD51409565 9A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2023.03.24 12:18:06 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन ,नवी मुंबई
३. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर (आयुक्तालय, पुणे मार्फत)
४. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१)(आ.पु.क) मंत्रालय,मुंबई
५. सामान्य प्रशासन विभाग (का-१६-ब) मंत्रालय,मुंबई
६. संबंधित कोषागार अधिकारी यांना माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी (आयुक्तालय, पुणे मार्फत)
७. संबंधित कर्मचारी (आयुक्तालय,पुणे यांच्यामार्फत)
८. प्रधान सचिव ,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय ,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
९. सहसचिव /उपसचिव ,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय ,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१०. निवड नस्ती, (का.७), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.